**जुन्या दर्जेदार दुर्मिळ नाटकांचे जतन व संवर्धन करण्यासाठी नाटकांची निवड करण्याकरीता तज्ञांची उप समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पुलदे-२०२२/प्र.क्र.१९५/सां.का.२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १० मार्च, २०२३

वाचा : १. शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग, क्र.सांकास १०८६/प्र.क्र.१९०/सां.का. १, दिनांक ३१.३.१९८७
२. प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी यांची जा.क्र. पुलदे - १९६० /२३२९, दि. १७.११.२०२२ व दिनांक १७.०२.२०२३ रोजीची पत्रे.

**प्रस्तावना :**

मराठी रंगभूमीस दीडशेहून अधिक वर्षांची परंपरा आहे यापूर्वी अनेक परंपरागत जुनी व दर्जेदार नाटके काळाच्या ओघात लुप्त झाली आहेत व त्या लुप्त झालेल्या नाटकांबरोबर त्या काळातील कलाविष्कारही काळाच्या आड गेल्याने त्या कलाकृती उपलब्ध होण्यास दुरापास्त झालेल्या आहेत. त्या दर्जेदार नाटकांच्या कलाकृती (जुन्या व नव्या) पुनःश्च व पुनरुज्जीवीत करुन त्या Digitalization ह्या माध्यमातून अवगत तंत्राद्वारे जतन करुन ठेवल्यास सदरची जुनी नाटके नाट्यप्रेमी लोकांना त्याचा आस्वाद घेता येईल, भावी पिढयांना उत्कृष्ट कलेचे ज्ञान होईल, सहजगत्या उपलब्ध होतील. तसेच, सांस्कृतिक वारसा व चळवळ अधिक बळकट व वृध्दींगत होण्यास मदत होईल. सदर योजना राबविण्यासाठी जुन्या दर्जेदार दुर्मिळ नाटकांचे जतन व संवर्धन करण्यासाठी नाटकांची निवड करण्याकरीता तज्ञांची उप समिती गठीत करण्याबाबत प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांचेकडून उपरोक्त संदर्भ क्र.२ पत्रान्वये प्रस्तावित करण्यात आले आहे. त्यानुषंगाने जुन्या दर्जेदार दुर्मिळ नाटकांचे जतन व संवर्धन करण्यासाठी नाटकांची निवड करण्याकरीता तज्ञांची उप समिती गठीत करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

जुन्या दर्जेदार दुर्मिळ नाटकांचे जतन व संवर्धन करण्यासाठी नाटकांची निवड करण्याकरीता तज्ञांची खालीलप्रमाणे उप समिती गठीत करण्याबाबतचा शासनाने निर्णय घेतला आहे.

| | **उप समिती सदस्यांची नावे** | **पदनाम** |
|---|---|---|
| १ | श्री.दिपक करंजीकर | अध्यक्ष |
| २ | श्रीमती पल्लवी जोशी-अग्निहोत्री | सदस्य |
| ३ | श्रीमती संपदा जोगळेकर-कुलकर्णी | सदस्य |
| ४ | डॉ.शिरीष ठाकूर | सदस्य |
| ५ | श्री.विनय येडेकर | सदस्य |
| ६ | श्री.विघ्नेश जोशी | सदस्य |
| ७ | श्री.शैलेश चव्हाण | सदस्य |
| ८ | प्रकल्प संचालक,पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी,मुंबई | सदस्य सचिव |

२. उप समितीची मुदत या शासन निर्णयाच्या दिनांकापासून ३ वर्षाच्या कालावधीकरता अथवा समितीची पुनर्रचना होईपर्यंत यापैकी जो कालावधी अगोदरचा असेल तोपर्यंत राहील.

३. उप समितीतील सदस्यांनी बैठक घेऊन ५ ते १० उत्कृष्ट जुन्या दर्जेदार नाटकांची निवड करावयाची आहे. सदर नाटके जतन करण्याच्या अनुषंगाने आवश्यक ती कार्यवाही करावयाची आहे.

४. उप समितीतील अशासकीय सदस्यांना बैठक भत्ता शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक बैठक २०१२/प्र.क्र.१/सेवा-५, दिनांक २४ मे, २०१२ नुसार व प्रवास भत्ता व दैनिक भत्ता शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक प्रवास-१०१०/प्र.क्र.२/सेवा-५, दिनांक ३ मार्च, २०१० मधील परिच्छेद १२ या प्रमाणे किंवा या भत्त्यांमध्ये शासनाकडून सुधारणा केल्यास त्यानुसार अनुज्ञेय राहील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०३१३१३२४१७५२२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA HEMANT WAGHMARE

Digitally signed by VIDYA HEMANT WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=4e214bf8a250420c28c2084d8dd965c0d454568322bd41981d48971712e51795, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F93EFE7B946BF26FF989D6E5E01E1B122B9EB4E3E4E6799CB8E82B2D33D58DFC, cn=VIDYA HEMANT WAGHMARE
Date: 2023.03.13 13:29:19 +05'30'

**( विद्या वाघमारे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई .
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७) उप सचिव (सां.का. /आस्थापना/अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई
९) सर्व अशासकीय सदस्य, (प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी यांचेमार्फत)
१०) निवड नस्ती (सां.का-२).